गोंडवना विद्यापीठाची स्थापना व विकास या योजनेसाठी आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत निधी वितरीत करणेबाबत...
(लेखाशिर्ष २२०२ एच ६६१)

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१८/ प्र.क्र. १८/ कार्यासन.६
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०००३२
तारीख: - ८ ऑक्टोंबर,२०१८.

**वाचा -**

१) वि. वि, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८ /प्र.क्र.६९ / अर्थ-३, दि. ०२.०४.२०१८.
२) उच्च व तंत्रशिक्षण विभागाची नस्ती क्र. गोंविग-२०१३ / प्र. क्र.१०७/विशि-२.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत गोंडवाना विद्यापीठाची स्थापना व विकास याकरिता मागणी क्र. टी-५, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, ०३- विद्यापीठ व उच्च शिक्षण, ७९६- जनजाति क्षेत्र उपयोजनोजनांतर्गत योजना, (०१) (०१) गोंडवना विद्यापीठाची स्थापना व विकास, गडचिरोली ( २२०२ एच ६६१ ), ३५- भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान यालेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता रु.१०.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे.

२. उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या वाचा क्र. २ येथील प्रस्तावास अनुसरुन आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत गोंडवाना विद्यापीठाची स्थापना व विकास याकरिता मागणी क्र. टी-५, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, ०३- विद्यापीठ व उच्च शिक्षण, ७९६- जनजाति क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना, (०१) (०१) गोंडवना विद्यापीठाची स्थापना व विकास, गडचिरोली ( २२०२ एच ६६१), ३५- भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान या लेखाशिर्षाखाली रु.४९६.०० लाख ( अक्षरी रुपये चार कोटी शहान्नव लाख फक्त) इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS ) वितरीत करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

३. प्रकरणी नियंत्रण अधिकारी / विभागप्रमुख यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय /उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास तसेच उच्च व तंत्रशिक्षण विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत सूचना देण्यात यावी.

४. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतुन आदिवासी उपयोजना क्षेत्रात पायाभूत सविधा निर्माण करण्याबाबतच्या तसेच वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात आणि आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील क्षेत्रात फक्त वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या **वाचा** क्र.१ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत असून सदर शासन निर्णयातील अटींची पुर्तता होत असल्याची उच्च व तंत्र शिक्षण विभागाने खात्री करावी.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१००६१८२८५४४६२४ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Digambarrao Aute

Digitally signed by Ravindra Digambarrao Aute
DN: cn=Ravindra Digambarrao Aute, o=Tribal Development Department, ou=Government of Maharashtra, email=rajendra.aute@nic.in, c=IN
Date: 2018.10.08 14:27:15 +05'30'

( रविंद्र दि. औटे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
३. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर.
४. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९ ), मंत्रालय, मुंबई.
५. उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
७. कार्यासन क्र. २ व ९, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
८. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग